तुकारामांचे पुष्कळ अभंग आहेत. विरक्ति व वैराग्य हें त्यांनीं साधावें. पण तुमची आमची काय गति? 'भाळीभोळीं कैशीं तरती,' हा विचार एकनाथांच्या मनांत होता. आह्मी लंगडीं व थोटीं माणसें. आह्मीं शास्त्राध्ययन करावें, तर पोटामागची काळजी सुटत नाहीं. अशी कोट्यावधि प्रजा. तेव्हां अशा प्रजेच्या गतीचा एकच मार्ग आहे. तो हा कीं, हरिभक्ति. आह्मांला योगमार्ग नको, ज्ञानमार्ग नको, किंवा कर्ममार्गही नको. आह्मी ब्राह्मण आहों, पण शास्त्राचें अध्ययन करणारे फार थोडे. कारण, बऱ्यांचजणांला पोटाकरितां अर्जन करावें लागतें. तेव्हां इंद्रियनिरोध होत नाहीं. ज्ञानाचा वँ कर्माचा-सुद्धां आह्मांला उपयोग व्हावयाचा नाहीं. तेव्हां ह्या मार्गा-पेक्षांही एक विशेष सुलभ मार्ग आहे, तो आह्मांला पाहिजे. तो एकनाथांच्या चरित्रांत जास्त आहे.

**न करितां वेदशास्त्रव्युत्पत्ति। ऐशिया अज्ञाना निजात्मप्राप्ति**
**सुगम जोडे ब्रह्मस्थिति। यालागीं हरिभक्ति प्रकाशिली देवें**
**तें हें राया भागवत जाण। मुख्यत्वें भक्ति प्रमाण।**
**भावें करितां भगवद्भजन। अज्ञान जन उद्धरती ॥ २ ॥**
**स्त्रीशूद्रादि अघवे। घालूनियां ये नावे।**
**एकेच खेपे स्वर्गे न्यावे। भजनभावें परतीरा ॥ ३ ॥**
**येथें पोहणेंयाविण उतरणें। प्रयासेंविण प्राप्ति घेणें।**
**सुखोपायें ब्रह्म पावणें। यालागीं नारायणें प्रकाशिली भक्ति**
**भागवतधर्माची स्थिति। भाळींभोळीं भवाब्धि तरती।**
**सुखोपायें ब्रह्मप्राप्ती। तोचि श्लोकार्थी विशद सांगे ॥ ५ ॥**

स्त्रीशूद्रादिकांस हा मार्ग सुलभ आहे. कारण, ह्या मार्गानें एकाच खेपेस एकाच नावेंतून स्त्रीशूद्रादि अवघी नेण्यांत येतात. कर्ममार्गी सांगतात कीं, चौऱ्यायशीं लक्ष फेऱ्यांतून आल्यावर ब्राह्मण नसलेत, तर ब्राह्मण होऊन ज्ञानी झाल्यावर, कालमर्यादा संपल्यावर, तुमचा उद्धार होईल; पण, ह्या समजुतीनें मनाची हुरहुर जात नाहीं. ह्या मार्गानें गेलें असतां बहुत कालांनी आपण देवापाशी सायुज्यता पावणार. तेव्हां कर्ममार्गानें मनाचें समाधान होत नाहीं. आह्मांला अशी नाव पाहिजे की, जी सागरांत चौऱ्यायशी लक्ष फेऱ्यांत आह्मांला न फिरवितां एका खेपेस आमचा उद्धार करील. असें साधन कर्ममार्गी ह्मणतात आमच्यापाशी नाही. ज्ञानमार्गी ह्मणतात, आहे; पण, जे महाभाग व योगमार्गी पुरुष तेच एका खेपेस पैलतिरास जातील. तेव्हां आमच्यासारख्यांची वाट काय ? अर्थात् भागवतधर्म. भागवतधर्म ह्मणजे काय ? तो वैदिक, पौराणिक नव्हे; किंवा, ज्ञान, योग, कर्म किंवा तीर्थे, व्रतवैकल्यें इत्यादि करणें नव्हे.

व्यासांनी पुराणें केली, पण त्यांची हुरहुर राहिली नाही. जेव्हां त्यांनी भागवत लिहिलें, तेव्हां त्यांचें समाधान झालें तें परीक्षित्यादींनी ऐकिलें, तेव्हां त्यांचें देखील समाधान झालें; तसेंच जर आपण वाचाल, तर आपलेंसुद्धां समाधान होईल. आमच्यासारखे अज्ञानी इंद्रियनिरोध करण्यास असमर्थ ह्मणून त्यांच्याकरितां हा भगवंतानें सांगितलेला भागवतधर्म

होय. ह्यांच्या संबंधानें वैष्णव व शैव ह्यांच्यांतलि भांडणां-
सारखीं भांडणें नाहींत. भागवतांतील देव सर्व देवांचा देव
आहे. तो एकनाथानें आपल्या चरित्रानें आपला केला. ज्ञाने-
श्वरांच्या चरित्रासारखें आपलें चरित्र होण्याची अपेक्षा
करावयास नको. कारण, पहिली गोष्ट ही की, त्यांचा बाप
संन्यासी होता, तुह्मांआम्हांला असे संन्याशी पैदा करितां
यावयाचे नाहींत. दुसरी गोष्ट ही कीं, त्यांचा तर काय, पण
त्यांच्या दोघांही भावंडांचा व्रतबंध करूं दिला नाही. हा
बीजाचा विचार झाला, आतां त्यांचा अधिकार तरी कसा
आणावा ? तेव्हां आह्माला हा मार्ग साध्य नाहीच. मग तुमची-
आमची वाट काय ? आपण साधीभोळी मंडळी खरी व
आपण आळशी आहों, तरी आपणांला भगवत्प्राप्तीची इच्छा
होते. ज्ञानमार्गाचें अवलंबन केलें असतां ती परिपूर्ण होत
नाही. ज्ञानमार्गाप्रमाणें पहिल्यानें ब्राह्मण असलें पाहिजे.
नामधारी ब्राह्मण पुष्कळ आहेत. त्यांपैकी ज्ञानप्राप्ति सर्वां-
सच करण्यास फुरसत कोठें असते ! पेन्शन् घेतल्यावर तसें
करावें, तर पेन्शन् घेण्यापूर्वींच आमची मंडळी आटोपते !
काल आठले वारले व मागें पंडित वारले. हिंवाळ्यांत जशीं
झाडांची पानें शुष्क होऊन गळतात, तशी आमची मंडळी
एकामागून एक गळूं लागली आहे. सारांश, म्हणून पेन्शन्
घेण्यापूर्वींच ही गोष्ट संपादावयास अवकाश राहिला नाहीं.
तेव्हां दहावीस वर्षांचा मक्ता घेतो कोण ? आमच्यामागें

ळचाडें भारी. म्हणून आम्हांला भक्तिमार्ग उत्तम होय. शांडिल्य सूत्रापासून तों एकनाथांपर्यंत हा मार्ग सांगण्यांत आला आहे. भक्तीचीं लक्षणें पुष्कळ आहेत. पण पुढील एका लक्षणाच्या पोटांत तीं सर्व आहेत. तें हें कीं, देवच काय तो आपला श्रेयस्कर. ह्यावरून एकनाथ हें नांव सार्थ आहे. देवावर आपलें आत्यंतिक प्रेम ठेवावें. वर्णाश्रमधर्म सोडून निरहंकृति राहिलें पाहिजे. अमुक एक वर्णांत मी जन्मलों, ह्मणून मी थोर, असें मानितां कामा नये. मीं पांढरा अंगरखा व गुलाबी पागोटें घातलें आहे, ह्मणून मी त्याचा अभिमान धरावा, हें ठीक नव्हे. वर्णादि प्रकार प्रासंगिक किंवा सहजगत्या आलेल्यापैकीं आहेत. म्हणून त्यांचा अभिमान धरूं नये. तर निरहंकृति राहून भक्ति करावी. भक्तीच्या ठायीं प्रीति, मुक्ति, वैराग्य व सर्व कांहीं आहे. म्हणून भक्त ह्मणतात कीं, आम्हाला मुक्ति नको, किंवा विरक्ति नको, भक्ति पाहिजे. हा भक्तिमार्ग सुलभही आहे व अवघडही आहे. देवावर प्रेम ठेविल्यानें हा मार्ग साधितां येणार आहे. असा भागवतधर्माचा अनुभव आहे. स्वर्ग व धर्म ह्यांच्यामधील हा पूल आहे. आपणांला संस्कृतांत सांगितलेला वस्तऱ्यांचा पूल नको. समजा, मुंबई व माहीम ह्यांच्यामध्यें वस्तऱ्यांचा पूल बांधिला, तर त्याच्यावरून जाणें अवघड होईल. आपणांला असा पूल पाहिजे कीं, त्यावरून म्हातारे व पोरेंबाळेंही सर्व जाऊं शकतील. सारांश, जनरस्ता पाहिजे. त्याचप्रमाणें आपणांस सर्वांस समजेल असें धर्मसार पाहिजे.

आपलें मुख्य कर्तव्य भगवंताची ओळख व्हावी, हें आहे. ती कशी होईल ह्याविषयीं तुकारामांनी व ज्ञानदेवांनी सांगितलें आहे. पण, एकनाथचरित्रांत त्याची परिस्फुटता विशेष दिसून येते. ह्या पुरुषाची आठवण व्हावी म्हणून त्याची पुण्यतिथि केली पाहिजे. ह्यांच्यासारखे भाग्यवान् पुरुष इतर देशांत झाले असतील, नाही असें नाहीं. मोझेस झाले, ख्रीस्त झाले, महंमद झाले; पण आपणांला त्याच्याशी कांही कर्तव्य नाहीं. तर जे एका रक्तामासाचे, त्यांच्याविषयीं आम्हांला विचार करावयाचा. त्यांच्या शरीरांचें मांस जर आमच्यांत आहे, तर त्यांच्या विचारांचें मांस आमच्यांत कां असूं नये ? गीतारहस्य सर्वांस सुलभ करण्याकरितां ज्ञानेश्वरांनी अवतार घेतला, सामर्थ्य दाखविण्याकरितां रामदास जन्मले व तुम्हाआम्हांकरितां एकनाथांचा जन्म होय. त्यांनी भक्त कसा असावा व देव कोणाला म्हणावें, ह्या गोष्टी भागवतांत सांगितल्या आहेत. त्यांत माझे विचार सांपडले म्हणून मी त्याची विशेष महती सांगतों, असें कोणी समजूं नये. हें भागवत वाचिलें असता मनाला शांति वाटून कृतार्थता वाटेल. बाय कांमुलांनीं जर विचारिलें की, आमचें कल्याण कशानें होईल तर त्यांना सांगावें की, भागवतधर्म पाहिल्यानें. सारांश हरिभक्ति करावी, साधुसमागम ठेवावा व ईश्वरावर निर्मळ प्रेम ठेवावें. असो. शेवटी भागवतधर्म कसा आहे हें समजून घेण्याकडे आपली प्रवृत्ति व्हावी, असें मी इच्छितों.



# सुधारकांचे चार वर्ग.



कंदरीत पहातां गेलें साल (१८९०) फार महत्वाचें होतें, असें आपणांस दिसून येईल. हिंदुस्थानच्या एका टोंकापासून तों दुसऱ्या टोंकापर्यंत, जिकडे तिकडे सर्व हिंदु लोकांचें मन एका गोष्टीकडे अगदी वेधून गेलें होतें. त्या एका गोष्टीपुढें बाकीच्या सर्व गोष्टी अगदी मागें पडल्या होत्या. या एका प्रश्नाच्या विचारांत लोक इतके गढून गेले होते कीं, त्यामुळें सर्वांस इष्ट व महत्वाचा असा जो राष्ट्रीयसभेचा प्रश्न तोही कांहीं कालपर्यंत अगदीं कोनाकोपऱ्यांत पडून गेला होता. पंजाब, सिंध, प्रयाग, काशी, कलकत्ता, मद्रास, दिल्ली, वऱ्हाड व दुसऱ्या अनेक ठिकाणीं चाललेल्या चळवळीची जी मी नुकतीच माहिती मिळविली, व जी आपणांसही माहीत असेलच, तीवरून माझ्या ह्मणण्याचा आपणांस प्रत्यय येईल. स्वतः आपल्याभोंवतीं चालत असलेल्या गोष्टी तर आपणां सर्वांस महशूर आहेतच. मुंबई येथें कांहीं इंग्रज स्त्रियांच्या मदतीनें दोन हजार सुशिक्षित स्त्रियांनी राणी सरकाराकडे पाठविलेला अर्ज, येथील तुळशीबागेच्या प्रचंड सभेकडून झालेली खटपट, त्याच्या उलट दुसऱ्या पक्षाच्याही लोकांनी केलेली खटपट, साताऱ्यांतील तशाच पद्धतीचे प्रयत्न,

वगैरे गोष्टीच्या इतिहासावरून एकंदरींत आपलें पाऊल पुढेंच पडत आहे, हें चांगलें व्यक्त होतें. व ही गोष्ट खचित मोठी समाधानकारक आहे. आतां या ठिकठिकाणच्या चळवळीपासून सर्वांशीं इष्ट असे परिणाम झाले नाहीत, यापासून सुधारणेस प्रतिबंध मात्र होणार, असें कित्येकांचें ह्मणणें पडतें; परंतु माझी समजूत तशी नाहीं. 'लष्करच्या भाकरी कोण भाजतो' या न्यायानें, कोणी कांहींही बोलो, कांहींही करो, जोंपर्यंत त्यापासून आपलें व्यक्तिदृष्टचा प्रत्यक्ष व तात्कालिक नफानुकसान दिसत नाहीं, तोंपर्यंत त्या गोष्टीच्या ह्मणून वाटेस जावयाचें नाहीं, ही स्थिति वास्तविक पाहातां फार भयंकर व अनर्थावह मानली पाहिजे. या औदासन्यापासून जितकें नुकसान होतें त्यापेक्षां प्रत्यक्ष प्रतिबंधापासून फारच थोडें नुकसान होतें. सुधारणेस पहिली व मुख्य अडचण ह्मटली असतां, तिजविषयीं उदासीनता ही होय. तें औदासीन्य नाहींसें होऊन लोक सुधारणेविषयीं एकदा विचार करूं लागले, ह्मणजे मग सुधारणेस अडचण काय ती कालावधीची. लोकानी एकदा विचार करण्यास आरंभ केला, ह्मणजे मग थोडक्याच कालानें ते योग्य विचार करण्यास लागतील, यांत संशय नाहीं. तेव्हां तात्पर्य काय कीं सामाजिक गोष्टींविषयी गेल्या वर्षी ठिकठिकाणी जी चर्चा चालू होती, त्यापैकीं कित्येकांची दिशा चुकली असली, तथापि त्याबद्दल खेद मानण्यापेक्षां मुळीं चर्चेस आरंभ झाला याब

द्दलच विशेष आनंद मानला पाहिजे. ज्या गोष्टीपासून उद्यांच आपलें स्वतःचें व्यक्तिदृष्ट्या हिताहित नाहीं, अशा सामाजिक गोष्टीविषयी वाटाघाट करण्यास तुळशीबागेंत पांच हजार लोकांनी जमावें, हेंच मुख्यतः अभिनंदन करण्यासारखें आहे. सभांतून ठिकठिकाणी होणारी भाषणें ज्यांच्या कधीं कानी पडली नाहीत व वर्तमानपत्रांतून होत असणारी चर्चाही ज्यांच्या कधी डोळ्यांखालून गेली नाही, अशा वर्गांतील लोकांचा येवढा मोठा समुदाय सामाजिक वाटाघाटीकरितां एका ठिकाणी जमावा व त्यांनीं क्षणभर आपल्या पायांपुरतेंच पाहण्याच्या क्षुद्र वृत्तीचा अव्हेर करून उच्च भरारी मारावी व सामान्य जनसमुहाच्या सुखदुःखाचा विचार करण्यास प्रवृत्त व्हावें, हें मनुष्यत्वाच्या उच्च कर्तव्यपरायणतेचें व्यंजक होय. या वृत्तीचा मनुष्याच्या अंतःकरणांत प्रादुर्भाव होत असतां, त्याचें शारीरिक अस्तित्व भासमान न होतां, त्याच्या आत्मिक अस्तित्वाची जागृति होत असते, व खऱ्या धार्मिकतेच्या श्रेष्ठ मानास तो पात्र होऊं लागतो. जोंपर्यंत मनुष्य ईश्वरदत्त बुद्धीचा उपयोगच करण्याचें मनांत आणीत नाही, तोपर्यंतची स्थिति मात्र खरोखर निराशेची होय. परंतु एकदा त्या बुद्धीचा मनुष्य उपयोग करूं लागला, म्हणजे मग निराशेचें अगदी कारण नाही. प्रथम प्रथम चुक्या होतील, परंतु लौकरच त्या बुद्धीचा योग्य उपयोग होऊं लागेल, याविषयी तिळमात्र संदेह नाहीं. ईशेच्छेनें

आपला व पाश्चात्य राष्ट्रांचा जो निकट संबंध झाला आहे, तो एक मोठी शक्ति आहे. व ही जबरदस्त शक्ति ईश्वरानें आपल्या दयालुत्वानें आपल्या बऱ्याकरितां योजिली आहे यांतही शंका नाहीं. आणि एकदा डोळे उघडून पाहाण्याची, व बुद्धि खर्चून विचार करण्याची लोकांस संवय लागली, ह्मणजे या शक्तीचा लोकांच्या डोळ्यांवर व बुद्धीवर योग्य व इष्ट संस्कार होणें, हें फक्त कालावधीवर अवलंबून राहाणार. लोक विचार करूं लागेपर्यंत केवळ निराशेची मात्र स्थिति असते. परंतु ते एकदा विचार करूं लागले ह्मणजे निराशेचा लय झाला ह्मणून समजावें. पुढें प्रश्न काय तो 'आज का उद्यां' एवढाच राहिला. व मीं सांगितलेल्या शक्तीची महती ज्यांस माहीत आहे, त्यांस हा काल फारसा लांब नाही हेंही सहज दिसून येणार आहे.

आतां, आजच्या प्रसंगी सुधारकांचे चार वर्ग आपल्यापुढें मांडावेत असा माझा मानस आहे. चार वर्ग ह्मणजे कालाच्या किंवा महत्वाच्या क्रमानुसार केले आहेत, असा भाग नाहीं. परंतु माझा आशय आपणास स्पष्ट कळावा ह्मणून हे केलेले आहेत. त्यांपैकी अमुकच एक चांगला, किंवा अमुक अधिक महत्वाचा, किंवा अमुक आजच्या काळास योग्य असा निर्णय करीत बसण्याचा माझा मुळीच विचार नाही. त्यांचा फक्त निर्देश करावा इतकीच माझी इच्छा आहे. या चार वर्गांपैकी सुधारकांचा पहिला वर्ग ह्मणून मी ज्यास ह्मणतों त्यास

'परंपरारक्षक सुधारक' असें नांव देतां येईल. या वर्गांतील लोकांचें असें ह्मणणें पडतें की, आमच्या सुखदुःखाचा ज्यांत संबंध आहे, अशा गोष्टींविषयी आह्मांस नव्यानें विचार करण्याची आवश्यकता नाहीं. आमचे पूर्वज फार शहाणे होते, व त्यांनीं लावून दिलेल्या मार्गापेक्षां अधिक कल्याणकारक व अनुकरणार्ह असा दुसरा मार्ग असणें मुळीं शक्यच नाही. तेव्हां या परंपरारक्षक सुधारकांच्या मतें सुधारणा ह्मणजे, जेथें आपली पूर्वपरंपरा सुटली असेल, तेथें ती फिरून स्थापन करण्यास प्रयत्न केला ह्मणजे आपलें काम झालें. उदाहरणार्थ, ब्राह्मणांनी भिक्षान्नावर निर्वाह करून उपदेश करावा. ही आपली पूर्वपरंपरा सुटली, यापासून आपलें नुकसान होत आहे. करितां ब्राह्मणांनीं पूर्व पद्धतीनुसार भिक्षावृत्तीचें अवलंबन करून उपदेशकांचें कर्तव्य बजावण्यास लागावें. क्षत्रियांनी शस्त्र धारण करून रणांगणाचा आश्रय करावा, वैश्यांनी व्यापारधंदा करूं लागावा व शूद्रांनीं एकनिष्ठपणें त्रिवर्णाची शुश्रषा करून आपल्या जन्माचें सार्थक करून घ्यावें व हें पूर्णपणें होऊं लागलें ह्मणजे सुधारणेची परमावधि झाली. याहून सुखतर स्थिति असणें सर्वस्वी असंभाव्य होय.

सुधारकांचा दुसरा वर्ग ह्मणून ज्यास मी ह्मणतों, त्यामध्यें व पहिल्या वर्गामध्यें एका प्रकारचें साम्य आहे, व कांहीं भेदही आहे. प्राचीन धर्मग्रंथांवर जशी पहिल्या वर्गांतील

लोकांची पूर्ण श्रद्धा आहे, तशीच या दुसऱ्या वर्गांतील लोकांचीही आहे. तात्पर्य, दोघांचाही पाया एकच आहे. परंतु या पायावर उभारल्या जाणाऱ्या इमारती मात्र परस्परांहून भिन्न आहेत. उदाहरणार्थ, समुद्रप्रयाण घ्या. पहिल्या वर्गांतील लोकांस जसें हें सदोष वाटतें, तसेंच दुसऱ्याही वर्गास वाटतें. पण ते ह्मणतात कीं, समुद्रप्रयाणा संबंधाचें जें वचन आहे, त्याचा अर्थ पहिल्या वर्गांतील लोक करतात तसा नाही. त्या वचनाचा अर्थ असा आहे की, हिंदूनें नाविकाचा धंदा केला, तर मात्र दोष सांगितला आहे. बाकी नाव चालविण्याचें काम न करितां नुसता समुद्रप्रवास केला, तर त्यांत अगदीं दोष नाहीं. तेव्हां या दुसऱ्या वर्गांतील सुधारकांस प्राचीन धर्मग्रंथ मान्य व आधारभूत आहेतच. परंतु त्यांचा अर्थ मात्र लोक करितात तसा नव्हे. तेव्हां त्याच वचनांचा योग्य अर्थ करून त्याप्रमाणें वागल्यास सर्व आवश्यक सुधारणा होण्यासारखी आहे. परंतु खऱ्या अर्थास अनुसरून वागावें ह्मणजे झालें. पंचवीस वर्षांपूर्वी झालेला पुनर्विवाहाचा वाद व दयानंद सरस्वतींचे प्रयत्न ही दोन्ही या दुसऱ्या वर्गाचीं उदाहरणें होत.

तिसऱ्या वर्गांत ज्या सुधारकांचा मी समावेश करितों, त्यांस वरील दोन्ही मार्ग पसंत नाहींत. ते ह्मणतात कीं, पहिल्या वर्गांतील सुधारकांच्या समजुतीप्रमाणें सुटलेली परंपरा पुनः सुरू केली, तथापि त्यापासून आमचा कार्यभाग

होणार नाहीं, इतकेंच नाहीं, तर उलट तसें करितां येणेंच शक्य नाहीं. ब्राह्मणांनीं पुनरपि भिक्षांदेहीचा आश्रय करावा व शूद्रांनीं केवळ सेवावृत्तींत समाधान मानून राहावें हें जसें अयोग्य आहे, तसेंच हें सांप्रत काली घडवून आणण्याची खटपट करणें ह्मणजे किती वेडेपणाचें आहे, हें भोंवतालच्या स्थिती-कडे पाहिलें असता, कोणासही कळणारें आहे. आह्मी आमच्या सदसद्विवेकशक्तीच्या अनुरोधानें चालणार. समुद्रांतून प्रयाण करण्यांत आह्मी एकादें पातक करतों, असें जर आमची मनोदेवता सांगत नाही, तर तें करण्यास प्रत्यवाय काय ह्मणून असावा? तसेंच नुसतें समुद्रांतून प्रयाण न करितां नाविकाचा धंदा केला, तथापि त्यांतही दोषाचा कांही एक भाग नाही. मग मूळ वचनाचा अर्थ दुसऱ्या वर्गांतील लोक—ज्यांस 'व्युत्पत्तिसुधारक' ह्मणतां येईल—जसा करितात, तसा केला तथापि त्यापासूनही आमचा उपयोग होत नाहीं. शिवाय, आपल्यास पाहिजे तसा अर्थ करणें एका अर्थीं गौण आहे. जर ऋषिवचनें आपणास आधारभूत धरावयाचीं असतील, तर त्याचा अर्थ त्या ऋषीच्या मनांत होता, तोच घेतला पाहिजे. त्याहून वेगळा अर्थ करूं पाहाणें हें अन्यायाचें आहे. आणि हे व्युत्पत्तिसुधारक करतात तोच योग्य अर्थ असला, तथापि आह्मांस इष्ट असणाऱ्या सर्व सुधारणा या व्युत्पत्तींचा आश्रय करून होण्यासारख्या नाहीत. आह्मांस हे दोन्ही मार्ग प्रशस्त वाटत नाहीत. स्त्री आणि पुरुष या

उभयतांसही जर एकच मनोवृत्ति आहे हें खरें आहे, तर मग एकानें वाटेल तेव्हां व वाटेल तितक्यांदा लग्न करावें व दुसऱ्यानें मात्र करूं नये, हा उघड अन्याय होय. मग धडधडीत ज्यांत अन्याय आहे, अशा गोष्टींविषयी कोणी पूर्वपरंपरा पुढें आणिली, किंवा व्युत्पत्तीचा आश्रय केला, तथापि ते दोन्ही प्रकार आह्मांस मान्य नाहींत. प्राचीन परंपरेंत जें ग्राह्य असेल, तें घेण्यास आह्मी तयार आहों. परंतु ज्या गोष्टी सदसद्विवेकास सोडून आहेत, त्या मात्र आह्मी टाकणार व आमच्या मनोदेवतेस योग्य दिसेल, असें आचरण ठेवणार. प्रार्थनासमाज, ब्राह्मसमाज वगैरे संस्था या तिसऱ्या वर्गाचे निदर्शक होत.

आतां राहिला चौथा वर्ग. यातील लोक ह्मणतात कीं, तुमची परंपरा उपयोगी पडत असेल, तर तितक्यापुरती ती तुह्मी घ्या. व्युत्पत्तीचेंही ग्राह्य योग्य प्रकारें घेण्यासारखें असेल तर तेंही घ्या. व तुमच्या सदसद्विवेकशक्तीचाही तुह्मी पूर्ण उपयोग करा. त्याबद्दल आमचें काहीं ह्मणणें नाही. परंतु आज पुष्कळ दिवसपर्यंत तुह्मी या गोष्टींचा अनुभव घेतला आहे. व त्यापासून ह्मणण्यासारखा उपयोग झाला नाहीं. लोकांची विवेकशक्ति जागृत करून, त्यांजकडून योग्य गोष्टीचा स्वीकार करविण्याकरितां पुष्कळ खटपट झाली, परंतु त्यापासून कांही निष्पन्न झालें नाहीं. विवेकशक्ति जोंपर्यंत प्रचलित असते, तोंपर्यंत, अमुक गोष्ट योग्य आहे, अमुक न्याय्य

आहे, हें सारे कबूल करितात. परंतु विवेकानें योग्य दिसणाऱ्या गोष्टी अमलांत आणण्याचा प्रसंग आला, ह्मणजे लोक तो विवेक विसरतात व विकारास वश होतात. त्यांचे सारे उन्नत विचार एका बाजूस राहतात व तूर्तापुरती नजर देण्याची क्षुद्र बुद्धिच प्रबळ होते. याकरितां ज्या गोष्टी लोकांस योग्य वाटतात, त्या त्यांच्याकडून प्रत्यक्ष होऊं लागण्यास, त्यांच्यावर जबरदस्तीच केली पाहिजे, त्यावांचून इलाज नाहीं. या बाह्य शक्तीचा आश्रय केल्यावांचून विवेकग्राह्य गोष्टीची अंमलबजावणी होणें नाही. याजकरितां योग्य व न्याय्य सुधारणा प्रत्यक्ष सुरू करणें असेल, तर बडग्याचाच उपयोग केला पाहिजे.

आतां येवढा वेळ जे मीं सुधारकांचे चार वर्ग सांगितले, तशा प्रकारचे वर्ग आपल्या व इतर देशांतही वेळोवेळी झाले, हें इतिहासावरून समजणारें आहे. ख्रिस्ती धर्म, बौद्ध धर्म, व मुसलमानी धर्म, यांच्या इतिहासांत हे चारी प्रकार दृष्टीस पडतात. मक्केंतून महंमदानें जेव्हां मूर्ति नाहीशा केल्या तेव्हां त्याजकडे संख्येचें बहुमत नव्हतें. तर शक्तीच्या बहुमतानेंच त्यानें ती सुधारणा केली. आपल्या म्युनिसिपालिट्यांचाही इतिहास असाच आहे. रस्ते साफ करणें, त्यांवर दिवे लावणें, लोकांच्या आरोग्यार्थ व्यवस्था करणें, वगैरे गोष्टी परंपरेला धरून असोत वा नसोत, त्या विचारास संमत असोत वा नसोत, त्या अवश्य आहेत असें ज्यांस दिसून आलें, त्यांनीं बहुमताच्या भरीस न पडतां, सत्तेच्या जोरावर त्या

सुरू केल्या. व आज त्याच म्युनिसिपालिट्या आह्मी बंद कर-णार, असें सरकार ह्मणूं लागल्यास, आह्मांस तें खपावयाचें नाही. व त्या आह्मांस पाहिजेत ह्मणून आह्मीच अर्ज करूं लागूं. तात्पर्य, हा चौथा प्रकार लागू करण्याचेही प्रसंग व स्थळें असतात. व कांही बाबतींत या चौथ्या उपायाचा आश्रय करण्यासारखा सध्याचाही प्रसंग आहे.

आतां या चारही प्रकारच्या सुधारकांपासून सुधारणेस साह्यच होत जातें, हें आपणा सर्वांस कबूल केलें पाहिजे. एकमेकांचा एकमेकांवर परिणाम घडल्यावांचून राहात नाही. पुनर्विवाहाबद्दल आजपर्यंत झालेले प्रयत्न व्यर्थ गेले नाहींत. हे प्रयत्न झाले नसते तर आज, 'पूर्वींचे लोक चुकले, ऋतुमती होण्यापूर्वी विधवेचें लग्न करावें अशी ते खटपट करते, तर सुधारणा साध्य झाली असती,' असे जे परंपरा सुधारकांच्या तोंडून शब्द निघतात ते खाचित निघाले नसते. त्याप्रमाणेंच तुळशीबागेच्या सारख्या सभांपासून नुकसान होतें असें जरी कित्येकांस वाटतें, तथापि एकंदरीत या सर्व चळवळींचें निदान आपणांस श्रेयस्करच होईल, यांत शंका नाही. मी असें ऐकतों कीं, यापूर्वी स्त्रियांकडून गेलेल्या अर्जाविरुद्ध अर्ज करण्याकरितां पुरुषाप्रमाणेंच स्त्रियांची एक सभा तुळशीबागेंत जमणार आहे. हें ऐकून मला फार आनंद होत आहे. परवांच्या सभेप्रमाणें पांच हजार स्त्रिया तुळशीबागेंत जमून एकमेकांच्या सुखदुःखांचा विचार करूं लागल्या, तर मग

सुधारणा लांब नाहीं. त्या तेथें जमून आपापल्या स्वतःच्या समजुतीप्रमाणें वाटेल ते ठराव करोत, तो एक अश्रुतपूर्व सुदिन होय, असें मी मानीन. आपल्या सुखदुःखांविषयीं आपणांस काय वाटतें, तें कळाविण्याची संधी जर स्त्रियांस पुणेकरांकडून मिळेल, तर मग आपल्याला फार दिवस सुधारणेकरितां थांबावयास नको. वर जो जबरदस्तीचा मार्ग सांगितला, त्यास स्त्रियांकडूनच शेवटीं मदत मिळणारी आहे . व स्त्रियांनी बंड केल्यावर पुरुषांचें कांहीं चालेनासें होऊन त्यांच्या ह्मणण्यास निमूटपणें मान वांकवावी लागते, याचा अनुभव आपणां सर्वांस आहेच ! असो; एक गोष्ट मात्र सर्वांनी लक्षांत ठेवली पाहिजे. मी ह्मणतों तेंच खरें असा आग्रह धरून दुसऱ्यास प्रतिबंध करण्यास प्रवृत्त होणें, हें कोणासही शोभत नाहीं. आपल्यास जो योग्य मार्ग दिसेल त्याचा आपण अवलंब करावा हें योग्य आहे. परंतु दुसऱ्यास तो पसंत नसल्यास त्याच्यावर तुटून पडणें, किंवा त्यास योग्य वाटत असलेल्या मार्गांत विघ्न आणणें, हें कोणासही अनुचित होय. क्रोधद्रोहादि मनोविकारांच्या तावडींत सांपडून मनुष्यत्वास विसंगत असें कोणाचेंही आचरण नसावें. आपल्या समजुतीप्रमाणें आपण वागावें, व दुसऱ्याच्या समजुतीप्रमाणें दुसऱ्यास वागूं द्यावें. नाहीं तर बखेडा मात्र होऊन सर्वांसच अपाय होण्याचा संभव आहे, हें विसरूं नये, ह्मणजे झालें.



# राजा राममोहन राय.



आज उपासने नंतर राजा राममोहन राय यांच्या चरित्रासंबंधानें व उपदेशासंबंधानें मी चार शब्द बोलावे अशी योजना करण्यांत आली आहे. आपणां सर्वांना अवगत असेलच कीं, आज ता० २७ सप्तेंबर हा दिवस त्यांची सांवत्सरिक पुण्यतिथि होय. विलायतेंत कांही कामानिमित्त गेले असतांना ते तेथें वारले; आणि त्यांचे अंत्यविधि तेथेंच त्यांच्या प्रिय-मित्रांनीं केले. त्यांचें निधन १८३३ सांत झालें; व आज आपण १८९६ वांत आहोंत. म्हणजे या स्थलीं व या प्रसंगी आपण त्या महात्म्याच्या मृत्यूची ६३ वी सांवत्सरिक तिथि साजरी करित आहों. जुन्या चालीच्या लोकसमुदायांत हा चालू पंधरवडा, म्हणजे भाद्रपद कृष्णपक्ष, एका पुरातन व हितकर चालीमुळें, पूर्वजांचें स्मरण करण्याकडे योजिलेला असतो. या पंधरा दिवसांत प्रत्येक स्त्रीपुरुषाची प्रवृत्ति आपल्या जन्मदात्यांचें ऋण कृतज्ञतेनें आठवावें याकडे असते. आतां जरी त्या पद्धतीला ह्या समाजांत स्थान नाही, व बाह्यविधींचें अनुसरण करणें आपणांस युक्त नाही, तरी आपल्या देशाच्या सर्व भागांत पितृप्रेम व कर्तव्यबुद्धि यांनी प्रेरित होऊन हजारों लोक पूर्वजांच्या ऋणाबद्दल कृतज्ञता दर्शवितात. त्यांत

कांहीं तरी अर्थ आहे व सत्यही आहे व त्याकडे दुर्लक्ष करणें उचित नव्हे. आजचा दिवस ज्यांना ब्राह्मसमाजाच्या जनकांपैकी एक जनक असें यथार्थत्वानें म्हणतां येईल अशा पुरुषाच्या मृत्यूची ६३ वी सांवत्सरिक तिथि आहे. जनकांपैकी एक जनक असें मी जें म्हणतों ते शब्द मी विचारपूर्वक योजिले आहेत. कारण, माझें असें मत आहे व तें मी अन्य प्रसंगीं व्यक्त केलेंच आहे की, आपण ब्राह्मसमाजाची जी मंडळी त्यांची पितृपरंपरा फार लांबची आहे. आज या देशांत जे अन्य पंथ चालू आहेत त्यांच्या परंपरेइतकी तरी निदान ती जुनी आहे. १८२८ सांतच ब्राह्मसंस्था प्रथम उत्पन्न करण्यांत आली आहे असें नव्हे, आपण फार पुरातन शाखेचे प्रतिनिधि आहोंत; पुरातन कितीं ह्मणाल तर भगवद्गीता व भागवत पुराण यांच्या इतकेंच नव्हे; त्याहूनही जास्ती,ह्मणजे नारद, प्रल्हाद व वासुदेव यांचा काल किंव्य नऊ ऋषभ जनक राजाला भेटण्या करितां आले त्या काळाइतकी लांब आपली पितृपरंपरा आहे. त्या काळापासून तों आज तागाईत साधूंची व संतांची अविछिन्न संतती चालू आहे. राजा राममोहन राय हे जरी ब्राह्मसमाजाच्या जनकांपैकीं एक जनक आहेत, तरी ते जसे आद्यजनक नव्हेत तसे शेवटलेही नव्हेत. कारण, या अर्वाचीन काळांतसुद्धां स्वामी नारायणपंथाचे स्थापक, केशव चंद्रसेन व पंडीत दयानंदसरस्वति यांचाही आपणांस लाभ घडलाच आहे;

व या गोष्टींवरून असें उघड दिसतें कीं, ज्यांनीं या आर्यावर्तास अनेक धर्म व संप्रदायांची पुण्यउदयभूमी केली, त्यांना ज्या तेजाची प्रेरणा होती, तें तेज अजून लोपलेलें नाही. असो.

राजा राममोहन राय यांचें चरित्र व उपदेश यासंबंधानें कांहीं सांगण्याचे अगोदर जर मी आपलें लक्ष एका गोष्टीकडे वळविलें तर ती गोष्ट आपणांस चित्तवेधक वाटेल असें मला वाटतें. म्हणून मी तिजकडे वळतों. ती गोष्ट अशी की, देवांच्या संबंधानें जे सांवत्सरिक उत्सव करण्यांत येत असतात ते त्याच्या जन्म दिवसा निमित्त असतात; परंतु थोर पुरुषांसंबंधी पाहतां त्यांच्या जन्म दिवसांचा विसर पडलेला असता, त्यांचा मागमूसही रहात नाही; परंतु पुण्यतिथि मात्र सर्व जगभर मोठ्या सन्मानानें पाळण्यांत येत असतात; ख्रिस्ती, मुसलमान, पार्शी, बौद्ध आणि हिंदू या सर्वांमध्यें याच चालीचा सार्वात्रिक प्रघात आहे. हें सारें आकस्मिकपणानें घडत असेल असें नाही. देवांच्या व अवतारी पुरुषांच्या जयंत्या त्यांच्या जन्मदिवशी करण्यांत यात्या व थोर पुरुष इहलोक सोडून जातात तोच दिवस स्मरणीय मानण्यांत यावा, हा जो भेद आहे त्याला एक चांगलें समर्पक कारण आहे; व तें हें की, या जगांत मोहाचे व पापाचे प्रसंग अनेक असतात, व त्यांपासून मृत्यु सोडवणूक करीपर्यंत, कोणाही मनुष्याला— ज्याचे त्याला किंवा त्याच्या मित्रांना—असें ह्मणतां यावयाचें नाहीं कीं, या जन्माची सार्थकता झाली, जीविताचा हेतु

सफल झाला. एका ग्रीकतत्वज्ञास अशाच प्रकारचा एक प्रश्न विचारण्यांत आला,तेव्हां त्यानें सांगितलें की,एखाद्या मनुष्याचें चरित्र गाऊं लागावयाचें तर तो मरे पर्यंत तरी थांबा.व तें सत्य आहे. इहलोकीं आपण जो आयुष्यपंथ क्रमीत असतों त्याचा हेतु फार गंभीर असतो. आपलें नियमन करून जिवनक्रमास सुदिशा लावावयाची असते; व नियमन करणें किती कठिण असतें याचा अनुभव आपणां सर्वांस आहेच. संसारयात्रेस निघालेल्या लक्षावधि लोकांत उद्दिष्टस्थली जाऊन पोंचणारांची संख्या किती अल्प असते! मार्गांत मोहाचे प्रसंग अनेक व शिवाय ज्या कांहीं अडचणी अनुभवाव्या लागतात त्यांनीच पुष्कळांची गाळण होते. व ह्मणून मृत्यु येईपर्यंत कोणाविषयीं असें म्हणतां येत नाहीं कीं, याच्या आयुष्याचा हेतु सफल झाला; ज्या उद्देशानें याला इहलोकीं पाठविण्यांत आलें तदनुरूप त्याचा जीवनक्रम झाला. व ह्मणून मागें रहाणाऱ्यांकडून मनुष्यांच्या मृत्युतिथींचेंच जें कीर्तन होत असतें त्याचें हें कारण आहे.

मोठेपण या शब्दानें जी जबाबदारी ध्वनित होते ती ज्यानें आयुष्याच्या शेवटल्या घडीपर्यंत बजाविली नाहीं त्यास महात्मा असें म्हणतां येत नाहीं. तर मग आपणांस ज्या प्रश्नाचें विवेचन करणें प्राप्त झालें तो प्रश्न असा कीं, मृत्यूनंतरही ज्यांचा बहुमान करण्यांत आपणांस प्रेम वाटतें अशांचा मोठेपणा कशांत असतो? जेव्हां,आपण आई,बाप, आजा, आजी व पूर्वज यांचीं श्राद्धें करितों तेव्हां ते मोठे होते किंवा नव्हते

ह्या प्रश्न नसतो. प्रत्येकाला आपले आईबाप सदोदित पूज्य असतातच. त्यांनी आपणांस जन्म दिलेला असतो, जी थोडीबहुत बरी स्थिति असते तिजबद्दल आपण त्यांचे ऋणी असतों. व ह्मणून अन्य प्रसंगीं जी कांही त्याविषयींची आठवण आपल्या चित्तांत वागत असेल त्याहून विशेष आदरानें व गौरवानें वर्षांतून एकदां आपण त्यांचें कृतज्ञतेनें स्मरण करावें व उतराई व्हावें हें आपलें कर्तव्यच असतें. परंतु जेव्हां सार्वजनिक रीतीनें थोरपुरुषांची पुण्यतिथि पाळावयाची असते तेव्हां असा प्रश्न सहाजिक उद्भवतो की, "तुह्मी आह्मी प्रत्येक जण मोठेपणा या शब्दानें जो अर्थ समजतों तो मोठेपणा कशांत असतो ? श्रेष्ठ स्वभावात ज्या गुणांचा अंतर्भाव होतो ते गुण कोणते ?" या विषयावर भिन्न भिन्न मतें आहेत, परंतु या विषयांची ज्या कोणाला गोडी वाटत असेल त्यांनी, कांही इंग्रजी ग्रंथ विशेषतः कार्लाइल याचा 'Heroes and Heroworship' आणि इमर्सन याचा 'Great and Representative Men' हे ग्रंथ काळजी पूर्वक वाचावे अशी मी शिफारस करितों. मनुष्याची ज्या मोठेपणामुळें आठवण वर्षानुवर्ष ताजी तवानी रहावी अशी आपणांस उत्कंठा असते तें मोठेंपण मनुष्यास कशानें प्राप्त होतें या प्रश्नासंबंधानें जें कांही सांगतां येण्याजोगें आहे तें सारें या दोन पुस्तकांत आपणापुढें मांडलेलें आहे. त्यांपैकीं कार्लाईलचें मत असें आहे कीं, सत्यपरायणता

व अचलनिष्ठा अशा या दोन गुणांनीं मोठेपण प्राप्त होतें. या विचारांत सत्याचा बराच अंश आहे असें प्रत्येकाच्या अनुभवास पटेल. कारण, आपण सर्व या संसाररूप रंगभूमीवर सोंगाचीच बतावणी करीत असतों. आपण लहान असूं, मोठे असूं, विद्वान असूं किंवा अविद्वान असूं, प्रत्येकाची एक लहानशी रंगभूमी असते व तिचेवर आपण डौलानें चालतों, करणी करतों, व वागतों सवरतों; व सर्व वेळ आपली व दुसऱ्यांची अशी समजूत करून देत असतों कीं, बतावणी कांहीं चाललेली नाहीं, सर्व सत्याचाच प्रकार आहे. परंतु जेव्हां आपण एकांतांत असतों व आपण कोणी पहात नसतें, तेव्हां आपलें आपल्यालाच हांसूं येतें व विस्मय वाटतो कीं, या रंगभूमीवर अभिनय कसा छान झाला! आपल्या पैकीं बहुतेकांना सत्याची चाड वाटत नसते. व ह्मणून हें खरें कीं, थोर पुरुषांचा स्वभाव सिद्ध होण्यास सत्यशीलता व अनन्य निष्ठा बऱ्याच अंशांनी कारण असतात. सर्वांत अतिशय वाण ज्या गुणांची आपल्यांत असते ते गुण सत्यशीलता व अनन्य निष्ठा हेच होत. थोर पुरुषांत, ह्मणजे जे या संज्ञेला पात्र असतात त्यांच्यांत, हें जें मोठेपणाचें लक्षण तें तुमच्या आमच्या सारख्या ज्या स्त्रीपुरुषांनीं हें जग भरलें आहे त्यांहून फारच मोठ्या प्रमाणानें आढळून येतें. यदाकदा आपण खरे व आस्थेवाईक असूं; परंतु स्वभाव-सिद्ध सत्यशीलता व आस्था ह्या ज्या थोर देणग्या आहेत,

ही जी अमोल संपत्ति आहे ती आपल्या वाट्यास आलेली नसते. जग ज्यांची थोर पुरुषांत गणना करितें त्या कोणाचेंही चरित्र घ्या; ह्मणजे त्यांच्यापैकी पुष्कळांचेठायी हेंच स्वभावाचें लक्षण आपल्याला आढळेल. लूथरचें उदाहरण घेतलें तरी त्याचे काळांत त्याच्याहून विद्वान् व शहाणे लोक नव्हते असें नाहीं. इरास्मस व मेलांकथन यांचे ठायी बुद्धीचे गुण त्याच्या इतके तरी निदान होतेच. परंतु त्यांच्यांत जे नव्हते व लूथरमध्यें होते ते दोन गुण ह्मणजे सत्यशीलता व अद्वितीय आस्था. आपलें बोलणें घ्या, चालणें घ्या, तें सारें ओढून ताणून चाललेलें असतें. आपल्यावर बाहेर कांही ताबा किंवा अम्मल नाही, हें आपणांस ठाऊक असतें, तरी आपल्या आपणच निर्बंध करून घेत असतों; आणि मग आपल्या प्रत्ययास येतें कीं, आचरणाची पूर्ण स्वतंत्रता आपणास राहिलेली नाहीं. थोर पुरुषांत असला कांहींएक प्रकार नसतो. हें जें थोर पुरुषांच्या स्वभावाचें लक्षण त्याचें मी आणखी एक उदाहरण देतों. एका मुसलमान खाटकाचा एक दहाबारा वर्षांचा मुलगा होता. बापानें त्याला आपलाच धंदा पुढें चालीव ह्मणून सांगितलें. परंतु त्याच्या हातांत जेव्हां सुरी दिली व मी जशी चालवीत आहें तशी तूं चालीव असें त्यास सांगितलें, तेव्हां तो ह्मणाला कीं, या गरीब मुक्या जनावरावर सुरी चालविण्याचे अगोदर माझ्याच शरीराच्या मर्मभागी ही सुरी लाविली तर कसें काय वाटतें

याचा मला अनुभव घेऊं द्या. याविषयी माझी खात्री होईपर्यंत मी ही सुरी चालविणार नाहीं, असें ह्मणून त्यानें स्वतःच्याच शरीरावर प्रयोग करून पाहिला, व वेदना दुःसह होतात असें प्रत्ययास येऊन त्यानें तो धंदा सोडला; ज्या परिस्थितींत जन्म झाला ती परिस्थिति सोडली, संसाराचा त्याग केला व वनांतरी जाऊन महाराष्ट्रांतील हिंदुमुसलमानांतील प्रख्यात साधु झाला. तो साधू श्रीगोंद्याचा शेख महमद हा होय.

तर ज्यायोगें मनुष्यास थोरपण येतें तें हें एक स्वभावलक्षण झालें. तरी नुसती सत्यशीलता असली व अनन्य आस्था असली ह्मणजे मनुष्य मोठा होतो असें नाही. त्याचे ठायीं दिव्य दृष्टि असली पाहिजे. दृश्य व अदृश्य वस्तूंच्या अंतःस्वरूपाची ओळख करून देणारी कल्पनाशक्ति त्याच्यांत असली पाहिजे. असे जे लोक असतात त्यांनाच अलौकिक बुद्धीचे पुरुष असें ह्मणतात. आपणांस ज्या स्वरूपानें वस्तु कधी भासत नाहींत अशा स्वरूपानें त्यांना त्या भासत असतात. अति परिचयानें वस्तूंचें रहस्य आपणांस क्वचितच अनुभवितां येतें. कशा तरी प्रकारानें आपल्या दृष्टीस मांद्य आलेलें असतें व त्यामुळें आपणांस वस्तूंचें यथार्थ स्वरूप निरखितां येत नाही. हा भेद स्पष्ट करून दाखविण्याकरितां आपण एक उदाहरण घेऊं.

दयानंद सरस्वतींनीं घरदार सोडलें व ते सन्यासी झाले. त्याला कोणता प्रसंग कारणीभूत झाला त्या विषयी एक हकी-

कत सांगण्यांत येते. आपणां सर्वांस ठाऊक आहेच की, ते एक थोर पुरुष होते. त्यांचे व आपले कितीही मतभेद असले तरी ही गोष्ट नाकबूल करितां यावयाची नाही. सध्यांच्या पिढी-पैकीं क्वचित्च कोणाची त्यांचे नांवाबरोबर गणना होणार आहे! असो; ते लहान असतांना त्यांच्या वडिलांनी एका उपवासाचे दिवशी रात्रीचे प्रहरी शिवालयांत पूजा करण्याकरितां त्यांना पाठविलें. बापाची आज्ञा अशी होती की, मुलानें सर्व रात्रभर जागें राहून अभिषेकपात्र भरलेलें आहे व देवावर सतत धार चालली आहे याविषयी काळजी घ्यावी. त्या प्रमाणें तो १०-१२ वर्षांचा मुलगा त्या स्थानी गेला व त्यानें रात्र बसून काढली. मध्यान्ह रात्रीचे सुमारास थोडा बहुत झोंपेचा अम्मल त्याच्या-वर बसूं लागला. त्याचा हात निश्चल राहिना, व डोळेही आपो-आप मिटूं लागले. त्यानें सर्व उपाय केले; तरी त्याला थोडीशी गुंगी आलीच. इकडे पहावें तर कोंदट व अंधेराच्या देवळांत नेहमीं आढळणारे जे घाणेरे प्राणी ते लिंगावर निर्धास्त बसले होते; कांही आवाजासरशी तो एकाएकी जागा झाला; व त्याच्या नजरेस आलें कीं, पाणी लिंगावर पडावयाचें तें उंदरा-वर पडत आहे! हा कांही अपूर्व अनुभव नव्हता. हा आपला सर्वांचा नेहमीचा अनुभव आहे. परंतु त्याच्या योगानें त्याला नवीन विचाराची दिशा सुचली; व घर सोडणें प्राप्त झालें. ह्या शुष्क बाह्य पूजेंत कांही अर्थ नाही, याहून कांहीं भिन्न मार्गानें आपल्या आत्म्यानें जगाच्या अंतरात्म्याची उपासना केली पाहिजे

असें त्याचे ध्यानांत आलें. हें एक उदाहरण झालें. तरी थोर पुरुषांत अपूर्व स्फूर्ति कशी असते हें यावरून स्पष्ट होतें. दिव्य-दृष्टि किंवा कल्पनाशक्ति ही देखील सत्यशीलतेप्रमाणेंच मनुष्याच्या मोठेपणाचें आवश्यक अंग आहे. या शिवाय आणखी एक मोठेपणाचें तिसरें लक्षण आहे. थोर पुरुषांत लोकांची मनें आपल्याकडे ओढून घेण्याची शक्ति असते. ह्या आकर्षणशक्तीला चुंबकाकर्षणाचें किंवा दुसऱ्या कोणत्या सृष्टशक्तीचें नांव देतां येत नाही. थोर पुरुषांत अशी कांही मोहिनी किंवा माया असते कीं स्वार्थत्याग व देशभक्ति यांचें जें तेज त्यांचे ठायीं असतें त्याचीच त्यांच्या सभोंवतालच्या लोकांमध्यें प्रेरणा होते. जो मनुष्य एकटा अलग राहतो म्हणजे ज्याच्या चरित्रास व उपदेशास इतरांच्या हृदयांत व बुद्धींत प्रवेश करण्याचें साधलें नाही, इतरांची बुद्धि व हृदय ज्याच्याशीं एकजीव झालेलीं नाहीत त्यास थोर पुरुष असें म्हणतां यावयाचें नाही.

सत्यशीलता, श्रेष्ठ मनोवृत्ति, शुद्ध हेतु, प्रेम व बंधुभाव यांच्या योगानें उद्दिष्ट हेतु साध्य करून घेण्याची क्षमता हीं जी स्वभावाची लक्षणें आहेत, त्यांच्या योगानें मोटेपण प्राप्त होतें; व या लक्षणांचा ज्यांचे ठायीं उत्तम विकास झालेला असतो ते श्रेष्ठ पुरुष होत. आपण सर्वांनी बुद्धाचें चरित्र वाचलेंच असेल. लोकांचे मनावर त्याची अशी छाप होती कीं, तो कोठेंही जावो, हजारों लोक, पूज्य

गुरु म्हणून, त्याचे मागें जावयाचेच; व म्हणून ज्या कांहीं संस्था त्यानें सुरु केल्या त्यांना शाश्वत यश मिळालें; व हें अर्थसिद्धीचें उदाहरण जगाचे इतिहासांत अपूर्व आहे. आणखी एक उदाहरण महम्मद पैगंबराचें घेऊ या. लिहितां वाचतां येत नाहीं असा एक गरीब मनुष्य, तरुणपणी धर्मस्थापनेचा विचार ज्याचे ध्यानीमनीही नव्हता असें असून त्यानें चाळीसावे वर्षी सर्वसंगपरित्याग केला; आरबस्थानासारख्या देशांत इकडून तिकडे सारखा उपदेश करित हिंडला, जिकडे जाई तिकडे छळ होई, व प्राण हातांत वागवावा लागे, अशी त्याची स्थिति होती. तरी स्त्रीपुरुषांचा त्याचे ठिकाणी असा कांही ओढा असे की, दहावीस वर्षांच्या अवधीत मोठमोठ्या बलाढ्य राजांस आपलें म्हणणें मान्य करविण्याचें त्यास सामर्थ्य आलें. असो. तर एकंदरीत मोठपण ह्मणजे काय याची साधारण कल्पना आता आपल्याला आली. आस्था, सत्यशीलता, दिव्यदृष्टि, तीव्र कल्पना व सर्वांत विशेष म्हणजे आकर्षणशक्ति. जीस आपण आत्मिक आकर्षण असें म्हणूं, हे जे गुण त्यामुळें मोठेंपण लाभत असतें. या प्रमाणें मोठा मनुष्य कसा असतो याविषयी माझी जी कल्पना आहे ती मी आपणापुढें मांडली आहे.

थोर मनुष्य अत्यंत धनवान असतो असें नाही; किंवा अत्यंत बुद्धिमान असतो, श्रेष्ठ पंडित असतो, किंवा अत्यंत यशस्वी असतो असेंही नाही. तर मग थोर मनुष्य कोणाला

ह्मणावें? तो गरीब असो वा श्रीमान् असो, विद्वान असो किंवा अविद्वान असो, व्यापार उदीम करित असो किंवा करित नसो, त्यास उद्योगांत बरकत असो वा नसो, या साऱ्या गोष्टी गौण आहेत. थोर पुरुषांत विशेष म्हणून जें असतें तें हें की, वर ज्या गुणांकडे आपलें लक्ष वळविण्याचा मीं प्रयत्न केला, त्यांपैकी बऱ्याचगुणांचा समुच्चय त्याचे ठायी असतो. अशांनांच थोर पुरुष असें ह्मणतात.

आतां आपण राजा राममोहन राय यांचेकडे वळूं. गेल्या दोन शतकांत हिंदुस्थानांत जे थोर पुरुष झाले, त्यांतील एक श्रेष्ठतम पुरुष व ब्राम्हसमाजाचे एक जनक असें त्यांना आपण पूज्यभावानें मानतों. आपला हा पूज्यभाव यथार्थ आहे किंवा नाहीं म्हणजे त्यांच्यामध्यें वरील गुणांपैकी किती गुण, किती अंशानें आढळतात हें पाहण्याचा आतां आपण प्रयत्न करूं. त्यांचें चरित्र अगदी साधें आहे. त्यांचा जन्म १७७४ त झाला व १८३३ सांत ते मरण पावले, म्हणजे त्यांचें चरित्र सुमारें ६० वर्षांचें आहे. येथें साठीच्या घरांत आलेले बरेच गृहस्थ आहेत. व कांहीं पलीकडेही गेलेले आहेत. असो; त्यांचा ब्राम्हणकुलांत जन्म झाला. नीट उपयोग केल्यास ब्राह्मणकुलांत जन्म होणें हा एक मोठाच अधिकार आहे. त्यांच्या आईचें घराणें शाक्तमार्गी होतें. बंगाल प्रांताकडे शाक्तमार्ग हा जुना संप्रदाय आहे. त्यांच्या वडिलांच्या कुलाकडे पाहिलें तर ते

वैष्णवमार्गी होते. म्हणजे शाक्त तेज व वैष्णव तेज आपला विरोध विसरून एकजीव झालीं आणि हा थोर पुरुष उत्पन्न झाला असेंच म्हणावयाचें. ह्या महात्म्यास जें कार्य साध्य करावयाचें होतें त्याचें हा वैष्णव व शाक्त मातापित्यांचा योग सूचकच होय. त्या जुन्या काळांत शाळा व पाठशाळा नव्हत्या. ह्मणून हा लहान मुलगा आपल्या वयाच्या १२वे वर्षी, आरबी व फारशी भाषा शिकण्याकरितां पाटणा शहरी गेला. आरबी व फारशी या त्या वेळच्या राजदरबारच्या भाषा होत्या. १६वे वर्षी तो काशीस गेला व तेथें त्यानें ४ वर्षे संस्कृताचा अभ्यास केला. तें अध्ययन पंडित होण्याकरितां नव्हतें, तर जुन्या विद्येचें खरें रहस्य समजून घेण्याकरितां होतें. ह्याप्रमाणें राममोहन आरबी व फारशी आणि संस्कृत विद्येंत निष्णात झाले. त्या वेळेपर्यंत इंग्रजीचा एक शब्दहि त्यांस ठाऊक नव्हता. तरी आरबी आणि संस्कृत तत्वज्ञानांत त्यांची जी गति झाली होती तिच्या योगानें मूर्तिपूजेसंबंधानें १६ वे वर्षी त्यांच्या मनांत तिटकारा उत्पन्न झाला. मूर्तिपूजेचें वेड बंगाल्यांत किती माजलें आहे, याची आपणांपैकीं पुष्कळांस कल्पना नसेल. मूर्तिपूजेमध्येंही प्रकार आहेत; परतु बंगाल्यांत कालीपूजेचा जो प्रघात आहे त्याचेविषयी आपणांस कल्पना देखील व्हावयाची नाही. अशा मूर्तिपूजेचा त्यांनी १६ वे वर्षी अधिक्षेप केला. आपण १६ वे वर्षी काय करित होतों व

त्यांनीं काय केलें हें ताडून पाहण्याजोगें आहे. त्यांच्या हृदयांत जें तेज स्फुरण पावत होतें, तसली ज्योत आपल्या हृदयांत होती काय? असो. परंतु या गोष्टीमुळें त्यांच्या वडिलांस संताप आला, व राममोहन राय ह्यांस घर सोडावें लागलें. त्यांनी हिंदुस्थानाबाहेर तिबेटपर्यंत प्रवास केला, व तेथें त्यांनीं बौद्धधर्माचें प्रत्यक्ष ज्ञान संपादन केलें. त्यांना मुसलमानी तत्वज्ञान अवगत होतें. संस्कृत तत्वज्ञानही अवगत होतें. व ४ वर्षे जीं त्यांनी प्रवासांत काढिली त्या अवधीत बौद्धतत्वज्ञानाशीं त्यांचा बराच परिचय झाला. चार वर्षांच्या प्रवासानंतर त्यांच्या वडिलांचें मन पालटलें व त्यांनी त्यांस घरीं येण्यास परवानगी दिली. घरी आल्यानंतर २०वे वर्षी त्यांनी इंग्रजी शिकण्यास सुरवात केली, व तो अभ्यास त्यांनी २५ विशीच्या सुमारास पुरा केला. पुढें ४०वर्षे वय होईपर्यंत त्यांचा काळ इंग्रज सरकारच्या नोकरीत गेला. तींत त्यांना मोठी अधिकाराची जागा प्राप्त झाली असें नाही. परंतु त्यांनी ठिकठिकाणी कलेक्टर किंवा डिस्ट्रिक्ट जज् यांच्या हेडक्लार्क किंवा शिरस्तेदारांची कामें केली असावीत असें मला वाटतें. ४० व्या वर्षी त्यांनीं पेन्शन् घेतलें, व प्रथमच ते कलकत्त्यास आले. तों कालपर्यंत त्यांचें कोणत्याही सार्वजनिक चळवळीत अंग नव्हतें. यापुढचा त्यांचा आयुष्यक्रम २०वर्षांचा आहे. १८१४ पासून तों १८३३ पर्यंतचा काळ त्यांनी सतत उद्योगांत घालविला. या एवढ्या कालांत

त्यांनीं जें काम केलें त्याच्याशी तुमच्या आमच्या सारख्या शेंकडो लोकांच्या कामाची तुलना केली तर त्यांनीं केलेलें काम फारच अधिक आहे असें म्हणावें लागतें. ते एकाच काळीं सामाजिक सुधारक होते व एक थोर धर्मसंस्थेचे प्रस्थापक होते; व तसेंच ते महान् राजकारणीही पुरुष होते. हे तिन्ही प्रकारचे उद्योग त्यांचे ठिकाणीं अशा रीतीनें एकवटून चालत असत कीं, सध्यां आपल्यांत जे श्रेष्ठ पुरुष आहेत त्यांना आपल्या कर्तृत्वाकडे पाहून लाजच वाटली पाहिजे. मनुष्याच्या कर्तव्याचे जेजे भिन्न मार्ग आहेत त्यांपैकीं एकाच विशिष्ट मार्गानें राजा राममोहन राय यांनीं देशसेवा चालविली असें नाही. त्यांनीं बहुपत्नीकत्वावर हत्यार उचलिलें. १८१८ त म्हणजे ज्या सुमारास मुंबई इलाखा इंग्रज सरकारच्या अमलाखालीं आला, त्या वेळीं त्यांनीं प्रथम सतीच्या चालीचें निंद्य स्वरूप उघड करून दाखविलें. या चालीविरुद्ध त्यांनीं या वेळेपासून तों १८२८ पर्यंत सारखें दहा वर्षें युद्ध चालविलें, परंतु या कामांत यश न मिळाल्यामुळें, हाच पुण्यहेतु मनांत धरून ते १८३० मध्यें साक्ष देण्याकरितां विलायतेस गेले. त्या वेळेस या चालीची चौकशी करण्याकरितां पार्लमेंटची कमिटी भरली होती व दिल्लीच्या बादशहानेंही त्यांच्याकडे कांहीं राजकीय काम सोंपविलें होतें. असो. सतीच्या चालीविरुद्ध त्यांनीं केलेली जी खटपट ती सामाजिक सुधारणेच्या बाबतींत त्यांची अत्यंत प्रमुख अशी कामगिरी होय.

त्यांनीं धर्मसंशोधनाकरितां काय प्रयत्न केले ते आपण आतां पाहूं. आपल्या देशांत जेव्हां उपनिषदें रचिलीं गेलीं त्या काळीं शुद्ध एकेश्वरी धर्माचेंच प्राबल्य होतें. त्याचें पुनरुज्जीवन करण्याकरितां त्यांनीं १८१४ त कलकत्त्यास आल्यानंतर एक समाज स्थापन केला. ब्राह्मसमाज हें त्याचेंच प्रगल्भरूप होय. त्या समाजाचे जागी जमावें, धर्मविषयक प्रश्नांचा उहापोह करावा, प्रार्थना करावी, किंवा दुसऱ्यानें उपासना चालविली असतां तिजबरोबर आपलें एकाग्र चित्त ठेवावें असा उद्देश व व्यवस्था होती. १८१४ पासून तों १८२८ पर्यंत हें काम त्यांनी कधी उत्साह कमी न होऊं देतां सारखें चालविलें होतें. व प्रचलित हिंदुधर्माच्या अभिमान्यांबरोबर व तसेच ख्रिस्तीधर्मोपदेशकांसह त्यांचे कडाक्याचे वादविवाद चालू असत. ख्रिस्त्यांना, हिंदूंना त्यांचें असें सांगणें असे कीं, तुह्मी आपल्या पुरातन साधूंच्या शहाणपणाच्या मार्गाचें पुनः अवलंबन करा. राजा राममोहन राय यांचा चरित्रविषयक ग्रंथ दोन भागांत प्रसिद्ध झाला आहे, त्याचें आपण अवलोकन करा, म्हणजे आपणांस असें आढळेल कीं, ख्रिस्ती धर्मोपदेशकांस उद्देशून त्यांनीं जे लेख व पुस्तकें लिहिली आहेत, त्यांचाच जवळ जवळ एक सबंध भाग झाला आहे; व बाकीच्या भागांत वेदांत व उपनिषदें यांतील तत्वज्ञानाचें त्यांनीं जें विवरण केलें तें आलें आहे, या तीस वर्षभर त्यांचें वाचन व लिहिणें, उपदेश करणें, व नित्य

चालींतील दोषांचें आविष्करण करणें व त्यांचा निषेध करणें, दुष्ट मतांचें खंडण करणें व वादविवाद करणें या साऱ्या गोष्टी चाललेल्या असत. परंतु हा क्रम चालू असतांना आपल्या देशाच्या राज्यव्यवस्थेंत काय न्यूनें आहेत, लोकांच्या गरजा काय आहेत हें समजून घेण्यासही ते कधींही चुकले नाहींत. इंग्रजी राज्याच्या प्रारंभीचा तो काळ होता. १८३३ त ईस्ट इंडिया कंपनीला नवी सनद पार्लमेंटकडून मिळावयाची होती, अशा सुमारास त्यांस हिंदुस्थानांतून विलायतेस येण्याकरितां आमंत्रण आलें, त्यांनी पार्लमेंट कमिटीपुढें फार महत्वाची साक्ष दिली. परंतु दुर्दैवानें त्यांना तेथील हवा मानवली नाहीं, व ते देशकार्यास बळी पडले. आपल्या प्रियदेशाहून फार दूर, परकी देशांत व परकी लोकांत, त्यांचें निधन झालें.

ह्याप्रमाणें त्या थोर पुरुषाच्या चरित्राचें निरूपण केलें आहे. राजा राममोहन राय यांनी ब्राम्हसमाज स्थापन केला आणि ती संस्था त्यांचें जिवंत स्मारक आहे. त्यांनी सतीच्या चालीचें निर्मूलन करावें एतदर्थही प्रयत्न केले. ते प्रयत्न सफल झाले हें पाहण्यास ते जरी वाचले नाहींत, तरी या थोर पुरुषानें जे श्रम केले होते त्यामुळें त्यांच्या मृत्यू नंतर पांचच वर्षांनी सतीची चाल बंद करणें सरकारास अवश्य वाटलें. सतीची चाल किती भयंकर होती या विषयीं आपल्या इकडे फारच थोडी

माहिती आहे. सतीची चाल बंद केली ही एक चूक केली असें म्हणणारे अजूनही कांहीं लोक आहेत. परंतु राजा राममोहन राय यांनीं जे लेख लिहिले आणि पार्लमेंट सभेपुढें जे अर्ज सादर केले त्यावरून या चालीच्या भयंकर स्वरूपाची आपणांस थोडी तरी कल्पना करितां येण्याजोगी आहे. एका लेखांत त्यांनी १४ वर्षांचे आंकडे दिले आहेत, त्यांवरून पाहता केवळ बंगाल्यांतील दाक्षिण प्रांतांतच आठ हजार बायका सती गेल्या असें दिसून येतें. म्हणजे साधारणपणें दर वर्षास सहाशें असें प्रमाण पडतें. गेल्या शतकांत असें एकही घर सांपडत नसे कीं, ज्या घरची एखादी तरी बाई सती गेलेली नाहीं. हें सती जाणें स्वेच्छेनें होई असें नाही. अग्निप्रवेश करणें बायकाना भाग पडे. दुःखाच्या आवेशात एकदां एखाद्या बाईनें होय म्हणून म्हटलें, कीं, तिचे नातलग तिला आपला बेत बिलकूल बदलूं देत नसत. ही चाल जर सरकारांनी बंद केली नसती तर आजही आपल्या डोळ्या देखत त्याच भयंकर गोष्टी अनेकदां घडल्या असत्या. हे सारे भयंकर आणि उग्र प्रकार नाहीसे करण्याचें श्रेय कोणाला द्यावयाचें असेल तर तें सर्वथैव राजा राममोहन राय यांसच दिलें पाहिजे. त्या काळी फक्त सती जाण्यासारख्या अमानुष यातना लोक स्वतः होऊन सोशीत असत; एवढेंच नसून पुरुष व बायका आपणाला पाण्यांत बुडवून

घेत, किंवा उंच कड्यावरून पाण्यांत उड्या घालीत, आणि अशा तऱ्हेनें नाना प्रकारें करून मृत्यूस आमंत्रण देत. अशा तऱ्हेनें राष्ट्राचे आचार विचार भलत्याच मार्गानें भडकून गेले होते. त्यांना योग्य वळण देण्याचें सर्व श्रेय राजा राममोहन यांनाच आहे. आज या स्थळी त्यांनीं केलेल्या राजकीय खटपटीबद्दल मी कांही बोलत नाही; परंतु जर कोणाला खरी देशभक्ति म्हणजे काय हें समजून घ्यावयाचें असेल तर त्यानें ६० वर्षांपूर्वीं—ह्मणजे आपल्या कांग्रेस, कान्फरन्स यांच्या अमदानीपूर्वीं—राजा राममोहन राय यांनी पार्लमेंटपुढें जी साक्ष दिली व सरकारी अधिकाऱ्यांस जी पत्रें लिहिलीं आहेत त्यांचें अवश्य परिशीलन करावें.

धर्मसंबंधी चळवळीकडे त्यांचें विशेष लक्ष असे; त्याकडेच आतां आपण वळूं. त्यांनीं १८०४त "आत्मीय सभा" स्थापन केली. १४ वर्षांच्या कालावधीनें तिचाच विकास होऊन 'ब्राह्मसमाज' निर्माण झाला. ब्राह्मसमाजाची स्थापना १८१८त झाली. ब्राह्मसमाज म्हणजे काय हें ज्यांना खरोखर समजून घेण्याची इच्छा असेल, चार लोक त्या संस्थेबद्दल काय म्हणतात, तेवढ्यानेंच ज्यांचें समाधान होत नसेल, त्यांनीं ब्राह्मसमाजाचें व्यवस्थापत्र ( ट्रस्टडीड ) वाचून पहावें, हाच उत्तम मार्ग आहे, असें मला वाटतें. ब्राह्मसमाजाचे जे उन्नत हेतु आणि उद्देश आहेत, त्यांविषयीं या थोर पुरुषांचीं काय मतें होतीं तीं त्यांनीं या व्यवस्थापत्रांत सांगि-

तली आहेत. या पत्रांतील प्रत्येक शब्दांत धर्मशीलता, निःसीम भाव व श्रद्धा आणि सर्व धर्मांविषयीं सहिष्णुता हीं ओतप्रोत भरून राहिली आहेत. व आत्म्याचें सौंदर्य व पूर्णावस्था म्हणजे काय या विषयीं जी उदात्त कल्पना दिसून येत आहे, त्या उदात्त कल्पनेचें रहस्य त्यांच्या अनुयायांना देखील अजून पुर्तेपणी कळलेलें नाहीं; आणि त्या कल्पनेचा पूर्ण भाव आपल्या सर्व लोकांच्या ध्यानांत येण्यास अद्याप बरीच शतकें लागतील असें वाटतें. ब्राह्मसमाजाची भवितव्यता काय आहे, ही गोष्ट कालांतरानें प्रत्ययास येणारी आहे. या संस्थेच्या वाट्यास अपयश येणार नाहीं, असें आपणांस खात्रीनें ह्मणतां येत नाहीं. पण ती यशस्वी होईल अशी आपणांस आशा वाटत आहे. ही संस्था काढण्यांत त्यांचा काय उद्देश होता हा जो प्रश्न आहे त्याविषयीं मात्र वादविवादास स्थान नाहीं. त्यांचा काय उद्देश होता हें मी आपणांस सांगतों. व तो अत्यंत श्रेष्ठ आहे की नाहीं याविषयीं आपण विचार करून पहावें अशी मी विनंति करितों. समाजाच्या अनुयायांनी व जे समाजाच्या बाहेर आहेत त्यांनीही सर्वांनी त्यांची कल्पना ध्यानांत घ्यावी; व आपल्या देशांत किंवा अन्य देशांत जे श्रेष्ठ पुरुष होऊन गेले त्यांनी धर्मसंस्थेची जी उदात्त स्वरूपें कल्पिलीं त्यांच्या तोडीची राजा राममोहन राय यांची कल्पना आहे किंवा नाहीं याचा विचार करावा.

त्यांच्या मनांत जो विचार नेहमीं वागत असे तो हा होय. अन्य राष्ट्रांना धर्मसंबंधी पूर्व इतिहास आहे हें खरें. परंतु त्या सर्वांवर कडी करणारा असा ज्याचा धार्मिक इतिहास आहे तें राष्ट्र आपलें हिंदुस्थान हेंच होय. ह्या राष्ट्राकडे पाहिलें तर त्यांत थोर वृत्ति आहेत, स्वभाव, वळण चांगलें आहे, व सर्व आकांक्षाही धार्मिकच आहेत. एकेश्वरी मताचें शुद्ध स्वरूप जगांत अन्यत्र कोठेंही दिसून येत नाही. अशा स्वरूपाचें या राष्ट्रानें आकलन केलें आहे. त्या स्वरूपाचें ज्ञान आपोआप अवचितपणें झालें आहे, किंवा कोणा एका मुनीनें उपदेश करून मिळवून दिलें आहे, असें नाही. धर्मविचाराची वाढ हळु हळु विकास होऊनच ती कल्पना आपणांस प्राप्त झाली आहे. मनुष्याच्या मनाला एकेश्वरी मताच्या शुद्धतम प्रकारची जी कल्पना करितां येण्याजोगी आहे, ती भगवद्गीतेंत व उपनिषदांत विकसित झालेली आहे. राष्ट्राच्या उन्नत विचाराची दिशा व विश्वास अशा प्रकारचा आहे की, ईश्वर हा सर्वव्यापक परमात्मा आहे, तो अद्वितीय आहे, त्याचेच ठायीं आपला जन्म होतो, आपण वागतों सवरतों, व आयुष्यक्रमण करितों. तो कारणांचें आदिकारण, तो सर्वांचा प्रभु, सहाय्यकर्ता, शास्ता आहे, पित्याहूनही अत्यंत वत्सल व मातेहूनही अत्यंत प्रेमळ असा आहे. ईश्वराविषयी आपली जी कल्पना ती अशा प्रकारची आहे व विटेवर वीट रचावी, थरावर

थर घालावा, एक मजल्यावर दुसरा बांधावा म्हणजे जशी मोठी इमारत तयार होते तशा प्रकारानें या कल्पनेचें उन्नतरूप आपणांस प्राप्त झालें आहे. बरें, ही श्रेष्ठ कल्पना ज पंडित आहेत, तत्वज्ञ किंवा शास्त्री आहेत, त्यांच्याच हृदयांत वागत आहे असें नाही. तर ती सर्वसाधारण अशी आहे. कोणचाही वर्ग घ्या, कनिष्ठांतील कनिष्ठ जात असो, समाजांत त्या जातीची मानमान्यता नसो, किंवा धंदा अत्यंत हलका असो, म्हणजे गरीब शेतकरी, फासेपारधी, माळी, कोळी, साळी, सोनार, न्हावी, वाणी, इत्यादि सर्व जातींनां ब्राह्मण पंडित किंवा योगी याच्या बरोबरीनें ईश्वराच्या श्रेष्ठ स्वरूपाची ओळख झालेली आहे.

आपल्या देशांत सर्वत्र एकेश्वरी मताचा प्रसार आहे हें पाहून राजा राममोहन राय यांजला जितकें आश्चर्य वाटे तितकेंच या उन्नत श्रद्धेचा व्यवहारांत कांहीं एक उपयोग केला जात नाही या विचारानें त्यांना खेद होई. कारण, आपल्यांत जे बाह्यविधि व उपचार आहेत ते या श्रद्धेशीं सर्वपरी विसंगत असे आहेत. ह्या बाह्य विधि व उपचारांच्या प्राबल्यामुळें आपल्या राष्ट्राची प्रवृत्ति नाना तऱ्हेच्या देवांची व देवतांची, ह्मणजे महाभूतें, स्थळविशिष्ट व जाती विशिष्ट देवदेवांची पूजा, अत्यंत चमत्कारिक, गलिच्छ व अमानुष अशा प्रकारानें करण्याकडे होत आहे. उपनिषदांत

पाहिलें तर देव एक व अद्वितीय आहे व त्याचीच पूजा करावी असें गीतेंत सांगितलें आहे. तरी असें शिक्षण असून आपल्याकडे अनेक देवांच्या पूजेचे प्रकार वाढले आहेत. देव एक आहे अशी धर्मबुद्धि, व पूजाअर्चा पाहिली तर अनेक देवांची—हा जो विरोध आहे तो जो कोणी आपल्या धार्मिक आचारविचारांची चौकशी करण्यास निघतो त्यास चकित करून सोडतो व तो विरोध कां असावा या विषयीं कांहींच उमज त्यास पडत नाहीं. राजा राममोहन रायासारख्या महात्म्यास याचें किती आश्चर्य वाटलें असेल याची आपणास कल्पना करितां येईलच. लहानपणापासून त्यांच्या हृदयांत मूर्तिपूजेचा तिटकारा बळावला होता, पूजेच्या बाह्य विधींवर त्यानी हत्यार उचलिलें होतें. ह्या विरोधाविषयी त्यांनी विचार करावा, मनन करावें व हा विरोध नाहींसा करण्याकरितां श्रम करावे व दुःखें सोसावीं. व तीं सर्व इतक्या पराकाष्ठेची की, त्यांविषयीं आपणांस कल्पनाही व्हावयाची नाहीं. त्यांच्या मनापुढें जो प्रश्न सदोदित असे तो असाः—हिंदुस्थानांत एकेश्वरी मत असून त्याबरोबर एकाच देवाची पूजा नाहीं हें कशामुळें होत असावें? इतर देशांकडे पाहिलें तर त्यांच्यांत एकेश्वरी मत इतक्या निष्ठेनें संमत असलेलें दिसत नाहीं, तरी एकाच देवाच्या पूजेची चाल आज दोन अडीच हजार वर्षें चालू आहे. हा जो प्रश्न आहे त्याविषयी आपण प्रत्येकानें विचार करावा अशी मी विनंती करितों. मी या संबंधानें आज

येथें कांहीच उत्तर देत नाही; कारण जरी मी त्याविषयीं पुष्कळ दिवस विचार करित आहें, तरी सयुक्तिक व सुसंगत असें उत्तर मला अजून सापडलें नाही. प्रश्न जो आहे तो मूर्तिपूजा असावी की नसावी हा नाहीं. तो जो भेद आहे तो उपासनेच्या प्रकारासंबंधानें आहे, उपासनेचा विषय म्हणजे ज्याची उपासना करावयाची त्यासंबंधानें नाही. परंतु मीं आपलें लक्ष्य ज्या विरोधाकडे वळविलें आहे, त्याचीं मुळें फार खोल आहेत व त्या संबंधानें आपण अत्यंत आस्थेनें विचार केला पाहिजे. बहुतकरून स्थिति अशी असते कीं, देशांत अनेक देवताविषयक मत असलें व त्या मतामुळें आपल्या श्रेष्ठ बुद्धीच्या प्रेरणेविरुद्ध लोकांचे ग्रह होत असले म्हणजे मूर्तिपूजा प्रचारांत येत असते. एकच ईश्वरी इच्छा सर्व सृष्टीच्या व्यापारांचें नियमन करित नाहीं, सृष्टीचे व्यापार व मनुष्यांचें सुखदुःख घडवून आणण्यांत अनेक देव व देवतांचें नानाप्रकारेंकरून अंग असतें व म्हणून या गौण देवतांचें आराधन त्यांचें त्यांच्या दिवशी व त्यांना इष्ट अशा रीतीनें केलें पाहिजे, अशी समजूत असली म्हणजे तिचा परिणाम मूर्तिपूजा या रूपानें दिसून येतो. एका सर्वशक्तिमान प्रभूची भक्ति करावयाची व बरें वाईट करण्याचें ज्यांच्या हातीं आहे अशा गौण देवतांच्याही हक्काकडे लक्ष द्यावयाचें अशी बुद्धि असली म्हणजे मन सतत द्विधा झालेलें असतें व खरें अनिष्ट जें आहे तें हेंच होय. मूर्तिपूजा रोमन कॅथलिक पथात

आहे, व ख्रिस्ती व महंमदी लोकांत साधूंच्या व पीरांच्या पूजेचा प्रघात आहे. तरी एकंदरीनें या लोकांच्या पूजा-अर्चांचें जें विशेष लक्षण कीं एकाच देवाची पूजा करावयाची, त्याला बाध येत नाही. आपण या मर्यादेचें उल्लंघन केलें आहे व म्हणूनच आपल्या सभोंवती सर्वत्र अनन्वित अनाचार दिसून येतात. ही सध्याची जी आपली अवनति आहे ती पाहून राजा राममोहन राय यांस साहजिकपणें खेद होई. व म्हणून आपल्या पूजा अर्चा इत्यादि आचारांना आपल्या एकेश्वरी श्रद्धेला अनुरूप असें स्वरूप द्यावें या हेतूनें त्यांनीं आपल्या मना प्रमाणेंच ज्यांना वाटत होतें असे समान विचारांचे लोक जमविले व ब्राह्मसमाजाची स्थापना केली.

ब्राह्मसमाजाचा धर्म म्हणजे ईश्वरानें दिलेला नवा धर्म, किंवा ज्यांत ईश्वराचे उद्देश आतांच प्रगट झाले आहेत, असें त्यांचें मत नव्हतें. आपली धर्मविषयक श्रद्धा व आपलें तत्संबंधीं आचरण यांत एकरूपता स्थापावी येवढीच त्यांची आकांक्षा होती. एका परमात्म्याचीच उपासना करावी, व ती बाह्य विधीनें नव्हे तर अंःतकरणानें करावी, ईश्वरास आपल्याजवळील पदार्थ अर्पण करणें ह्मणजे उपासना नव्हे, तर आपला आत्माच त्याला अर्पण करावा; व असें आचरण होऊं लागलें म्हणजे एकवाक्यता झाली असा त्यांचा आशय होता. या विचारांत कांहीं परकीय आहे असें नाही. आपल्या धर्माचीं जीं जुनीं अमोल तत्वें आहेत त्याची योग्यता सर्व स्त्री पुरुषांनीं

ओळखावी व धर्मभोळेपणा व अज्ञान यांपासून आपली मुक्तता करून घ्यावी असाच केवळ त्यांचा उपदेश व इच्छा होती. जी कामगिरी बजावण्याच्या उद्देशानें ब्राह्मसमाजाची स्थापना झाली ती हीच होय. ती आशा कितपत सफळ झाली आहे हें सांगणें माझें काम नव्हे. जर त्यांचे हेतु परिपूर्ण झाले नसतील तर तो दोष त्यांचा नव्हे, आपलाच आहे. असो. या शतकाचे आरंभीं, त्यांचेपुढें जो प्रश्न होता तो आजही आपल्या पुढें आहे. व त्या प्रश्नाचा आपण जसा बरा वाईट निर्णय करूं त्यावरच पुष्कळ अंशानें आपलें इहलोकचें व परलोकचें कल्याण अवलंबून आहे. आज आपल्या वार्षिक उत्सवानिमित्त माझी आपणास अशी विनंति आहे कीं, त्यांनीं सोडविण्यास दिलेला प्रश्न आपण सतत हृदयांत वागवावा व आपल्या आत्म्याचा द्विधाभाव जाऊन एकनिष्ठा फिरून प्राप्त होईल असा निर्णय किंवा उपाय आपण शोधून काढाल अशी मी आशा करितों. व आपलें अंतःकरण व बुद्धि यांत एकवाक्यता उत्पन्न झाली, व आपले आचार-विचार यांत अविरोध असला ह्मणजे आपल्या २९ कोट प्रजेंत कधीं न भंगणारें असें ऐक्य होऊन आपल्या भागवत धर्मास सामर्थ्य प्राप्त होईल. ख्रिस्ती, मुसलमान व आर्य धर्मांमधील इतिहासपरत्वें जे भेद आहेत ते राहतील; पण ते, इमारत बांधण्याच्या ज्या नाना तऱ्हा आहेत त्या रूपानें राहतील. ख्रिस्तीचर्च बाह्यरूपानें मह-

